संगणक सांकेतांक- २०११०५२०१५३६३०००१

# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग एक-ल

वर्ष १, अंक ६५(२)] बुधवार, डिसेंबर २, २००९/अग्रहायण ११, शके १९३१ [पृष्ठे ७

किंमत : रुपये २०.००

असाधारण क्रमांक २३४

## प्राधिकृत प्रकाशन

(केंद्रीय) औद्योगिक विवाद अधिनियम व मुंबई औद्योगिक संबंध अधिनियम यांखालील (भाग एक, चार-अ, चार-ब आणि चार-क यांमध्ये प्रसिद्ध केलेल्या अधिसूचना, आदेश व निवाडे यांव्यतिरिक्त) अधिसूचना, आदेश व निवाडे.

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २ डिसेंबर २००९

## अधिसूचना

**किमान वेतन अधिनियम, १९४८.**

क्रमांक किवेअ. ८२००९/प्र.क्र. ११९९/कामगार-७.–किमान वेतन अधिनियम, १९४८ (१९४८ चा ११) (यात यानंतर ज्याचा " उक्त अधिनियम " असा निर्देश करण्यात आलेला आहे.) हा महाराष्ट्र राज्यास लागू करण्यात आल्यानंतर त्याच्या कलम ३ च्या पोट-कलम (१) चा खंड (ब) अन्वये महाराष्ट्र राज्यातील " कारखाने अधिनियम, १९४८ च्या कलम २ च्या पोट-कलम (एम) नुसार व्याख्या केल्याप्रमाणे किंवा कारखाने अधिनियम, १९४८ च्या कलम ८५ च्या कक्षेत येणाऱ्या परंतु या अनुसूचीच्या यादीतील कोणत्याही उद्योगातील न मोडणाऱ्या कारखान्यातील कामधंदा " यातील रोजगारात कामावर असलेल्या कामगारांना देय असलेले किमान वेतन दर निर्धारित करण्याबाबतचा प्रस्ताव अंतर्भूत असलेली जी अधिसूचना काढण्याचे प्रस्तावित केलेले आहे, त्या अधिसूचनेचा पुढील मसुदा उक्त अधिनियमाच्या कलम ५ च्या पोट-कलन (१) च्या खंड (ब) द्वारे आवश्यक असल्याप्रमाणे त्यामुळे परिणाम होण्याच्या संभव असलेल्या सर्व व्यक्तींच्या माहितीसाठी प्रसिद्ध करण्यात येत आहे, आणि त्याद्वारे अशी सूचना देण्यात येत आहे की, **महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात** सदरहू अधिसूचना प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून दोन महिन्यांनंतर महाराष्ट्र शासन उक्त मसुदा विचारात घेईल

उक्त मसुदाच्या संबंधात उपरोक्त कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही व्यक्तीकडून जे कोणतेही अभिवेदन कामगार आयुक्त, कॉमर्स सेंटर, ताडदेव, मुंबई ४०० ०३४ यांचेकडून येईल ते शासनाकडून विचारात घेण्यात येईल.

## मसुदा अधिसूचना

क्रमांक किवेअ. ८२००९/प्र.क्र. ११९९/कामगार-७.–ज्याअर्थी, महाराष्ट्र शासनाने राज्यातील " कारखाने अधिनियम, १९४८ च्या कलम २ च्या पोट-कलम (एम) नुसार व्याख्या केल्याप्रमाणे किंवा कारखाने अधिनियम, १९४८ च्या कलम ८५ च्या कक्षेत येणाऱ्या परंतु या अनुसूचीच्या यादीतील कोणत्याही उद्योगात न मोडणाऱ्या कारखान्यातील कामधंदा " यातील रोजगारात (यापुढे ज्याचा उक्त अनुसूचित रोजगार असा उल्लेख करण्यात आलेला आहे.) कामावर असलेल्या कामगारांना देय असलेले किमान वेतन दर शासन अधिसूचना, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र. किवेअ. १०२००२/८८/कामगार-७, दिनांक ३० जून २००४ अन्वये पुनर्निर्धारित केले आहेत.

आणि ज्याअर्थी, महाराष्ट्र शासनाने पुनर्विलोकन करुन उक्त अनुसूचित रोजगारातील कामगारांना देय असलेले किमान वेतन दर पुनर्निर्धारित करण्याचे ठरविले आहे.

ज्याअर्थी, आता किमान वेतन अधिनियम, १९४८ (१९४८ चा ११) हा महाराष्ट्र राज्यास लागू करताना त्याच्या कलम ३ च्या पोट-कलम (१) चा खंड (ब) आणि कलम ५ च्या पोट-कलम (२) याद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन शासकीय अधिसूचना, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक किवेअ. ८२००९/प्र.क्र. ११९९/कामगार-७, दिनांक २ डिसेंबर २००९ मध्ये प्रसिद्ध झालेल्या प्रस्तावाच्या संबंधात मिळालेली सर्व अभिवेदने विचारात घेतल्यानंतर आणि सल्लागार मंडळाचा सल्ला विचारात घेतल्यानंतर महाराष्ट्र शासन यापुढे दिनांक पासून उक्त अनुसूचित रोजगारात नोकरीत असलेल्या या सोबत जोडलेल्या अनुसूचीच्या स्तंभ (३) मध्ये नमूद केल्याप्रमाणे वेतनाचे किमान दर निश्चित करीत आहे.

## अनुसूची

| अ. क्र. (१) | कामगारांची वर्गवारी (२) | मूळ किमान वेतन दर (दरमहा रुपये) (३) | | |
|---|---|---|---|---|
| | | परिमंडळ-१ | परिमंडळ-२ | परिमंडळ-३ |
| १ | कुशल | ४६००.०० | ४३००.०० | ४०००.०० |
| २ | अर्धकुशल | ४५००.०० | ४२००.०० | ३९००.०० |
| ३ | अकुशल | ४३००.०० | ४०००.०० | ३७००.०० |

**स्पष्टीकरण.**– या अधिसूचनेच्या प्रयोजनार्थ,

(ए) **परिमंडळ-१.**–महाराष्ट्र राज्यातील सर्व महानगरपालिकांच्या हद्दीतील सर्व क्षेत्रांचे मिळून होईल.

(बी) **परिमंडळ-२.**–महाराष्ट्र राज्यातील ' अ ' व ' ब ' वर्ग नगरपरिषदांच्या हद्दीतील सर्व क्षेत्रांचे मिळून होईल.

(सी) **परिमंडळ-३.**–परिमंडळ-१ व परिमंडळ-२ वगळून राज्याच्या उर्वरित क्षेत्रांचे मिळून होईल.

(डी) रोजंदारीवर काम करणाऱ्या कामगारांस देय असलेले मजुरीचे किमान दर तो कामगार ज्या वर्गाचा असेल त्या वर्गासाठी निश्चित करण्यात आलेल्या मासिक मजुरीच्या दरांना २६ ने भागून येणारा भागाकार नजीकच्या पैशापर्यंत पूर्णांकात करून काढण्यात येईल.

(इ) किमान वेतनामध्ये साप्ताहिक सुट्टीच्या वेतनाचा समावेश असेल.

(एफ) किमान वेतन दरामध्ये मूळ वेतन दर, विशेष भत्ता आणि सवलती असल्यास, त्यांचे रोख मूल्य यासाठी अनुज्ञेय असलेल्या सर्व दरांचा समावेश असेल.

(जी) एखादा कुशल कामगार म्हणजे जो स्वतःच्या निर्णयशक्तीनुसार आपले काम कार्यक्षमतेने व जबाबदारीने पार पाडू शकतो असा कामगार.

(एच) अर्धकुशल कामगार म्हणजे सर्वसाधारणपणे नित्याच्या स्वरूपाचे काम करतो की, ज्यामध्ये निर्णय घेण्याची फारशी गरज नसते. परंतु तुलनेने त्याला दिलेले छोटेसे काम की ज्यामध्ये महत्त्वाचे निर्णय इतरांकडून घेतले जातात असे काम योग्य रीतीने पार पाडण्याची आवश्यकता असते. मर्यादित व्याप्तीचे नित्याचे काम पार पाडणे हेच त्याचे कर्तव्य असते.

(आय) अकुशल कामगार म्हणजे ज्यास लहानसा किंवा स्वतंत्र निर्णय घेणे आणि पूर्वानुभव असणे आवश्यक नाही. परंतु तरीही व्यावसायिक परिस्थितीची माहिती असणे आवश्यक आहे. असे साध्या कर्तव्यपालनाचा अंतर्भाव असलेले काम करणारा कामगार, म्हणून त्याच्या कामासाठी शारीरिक परिश्रमाशिवाय निरनिराळ्या वस्तूंची किंवा मालाची त्याला चांगली माहिती असणे आवश्यक असेल.

## परिशिष्ट

महाराष्ट्र राज्यातील दहा केंद्रांचा सरासरी ग्राहक मूल्य निर्देशांक (नवीन मालिका १९८२=१००) हा उक्त अनुसूचित रोजगारात नोकरीत असलेल्या कामगारांना लागू असलेल्या राहणीमान निर्देशांक असेल. महाराष्ट्र शासनाने नियुक्त केलेला सक्षम प्राधिकारी १ जानेवारी, आणि १ जुलै रोजी सुरु होणाऱ्या प्रत्येक सहामाहीच्या समाप्तीनंतर, त्या सहा महिन्यांसाठी उक्त कामगारांना लागू असलेल्या राहणीमान निर्देशांकाची सरासरी काढेल आणि ७१४ निर्देशांकावर अशा सरासरीची वाढ निश्चित करून अशा प्रत्येक अंकांच्या वाढीसाठी ज्या सहामाहीच्या संबंधात अशी सरासरी काढण्यात आलेली असेल, त्या सहा महिन्यालगत पुढील सहामाहीसाठी उक्त कर्मचाऱ्यांना देय असलेला विशेष भत्ता (यात यानंतर ज्याचा " राहणीमान भत्ता " असा निर्देश करण्यात आलेला आहे) परिमंडळाच्या संबंधित दरमहा रुपये ५.१० या दराने असेल.

२. सक्षम प्राधिकारी, **शासकीय राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे, उपरोक्तप्रमाणे हिशोब करून काढलेला राहणीमान भत्ता जेव्हा जानेवारी ते जून या कालावधीतील प्रत्येक महिन्यासाठी देय असेल, तेव्हा जानेवारी महिन्याच्या शेवटच्या आठवड्यामध्ये आणि जेव्हा जुलै ते डिसेंबर या कालावधीतील प्रत्येक महिन्यासाठी देय असेल, तेव्हा जुलै महिन्याच्या शेवटच्या आठवड्यामध्ये जाहीर करील :

परंतु, सक्षम प्राधिकारी, किमान वेतन निश्चित केल्याच्या दिनांकापासून देय असलेला राहणीमान भत्ता, जून किंवा डिसेंबर अखेरपर्यंत किंवा यथास्थिति, किमान वेतन दर निश्चित करण्यात आल्याच्या दिनांकानंतर लगेचच जाहीर करील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**बा. शि. वानखेडे,**

शासनाचे उप सचिव.

In pursuance of clause (3) of Article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Government Notification, Industries, Energy & Labour Department No. MWA-82009/CR-1199/Lab-7, dated 2nd December 2009, is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

B. S. WANKHEDE,
Deputy Secretary to Government.

## INDUSTRIES, ENERGY AND LABOUR DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 2nd December 2009

*NOTIFICATION*

MINIMUM WAGES ACT, 1948.

No. MWA. 82009/CR-1199/Lab-7.–The following draft of a notification which is proposed to be issued under clause (b) of sub-section (*1*) of section 3 of the Minimum Wages Act, 1948 (XI of 1948), in its application to the State of Maharashtra, containing proposal for revision of the minimum rates of wages payable to the employees employed in Scheduled employment, *viz.* Employment in any Factory as defined under clause (m) of section 2 or within the meaning of section 85 of the Factories Act, 1948 (LXII of 1948), not covered by any of the entires in the schedule, is hereby published as required by clause ( b) of sub-section (*1*) of section 5 of the said Act, for the information of all persons likely to be affected thereby; and notice is hereby given that the said draft will be taken into consideration by the Government of Maharashtra, after the expiry of two months from the date of publication of this notification in the *Maharashtra Government Gazette.*

Any representation, which may be received by the Commissioner of Labour, Commerce Centre, Tardeo, Mumbai 400 034, from any person in respect of the said draft, before the expiry of the abovesaid period, will be taken into consideration by the Government.

## *DRAFT NOTIFICATION*

No. MWA. 82009/CR-1199/Lab-7.–Whereas by the Government Notification, Industries, Energy and Labour Department, No MWA. 102002/88/ Lab-7, dated the 30th June 2004 the Government of Maharashtra has revised the minimum rates of wages payable to the employees employed in the Scheduled Employment *viz.* Employment in any Factory as defined under clause (m) of section 2 or within the meaning of section 85 of the Factories Act, 1948 (LXII of 1948), not covered by any of the entires in the schedule (hereinafter referred to as the said " scheduled employment") in the State of Maharashtra.

And whereas the Government of Maharashtra having reviewed the minimum rates of wages payable to the employees employed in the said Scheduled employment, considers it expedient to revise them further.

Now, therefore, in exercise of the powers conferred by clause (b) of sub-section (*1*) of section 3 read with sub-section (*2*) of section 5 of the Minimum Wages Act, 1948 (XI of 1948), in its application to the State of Maharashtra the Government of Maharashtra, after considering all the representations received by it in respect of the proposal published in the Government Notification, Industries, Energy and Labour Department No. MWA. 82009/CR-1199/Lab-7, dated the 2nd December 2009 and after consulting the Advisory Board, hereby revises, with effect from the minimum rates of wages payable to the employees employed in the said scheduled employment and refixes them, as set out in column (3) of the said Schedule appended hereto, as the minimum rates of wages payable to the class of employees employed in the said scheduled employment mentioned against them in column (2) of the said Schedule.

*Schedule*

| Sr. No. | Class of Employees | Minimum Rates of Wages (Per month) | | |
|---|---|---|---|---|
| (1) | (2) | (3) | | |
| | | Zone-I | Zone-II | Zone-III |
| 1 | Skilled | 4600.00 | 4300.00 | 4000.00 |
| 2 | Semiskilled | 4500.00 | 4200.00 | 3900.00 |
| 3 | Unskilled | 4300.00 | 4000.00 | 3700.00 |

*Explanation.*—For the purposes of this notification,

(*a*) Zone I–Shall comprise of the areas falling within the local limits of all Municipal Corporations ;

(*b*) Zone II–Shall comprise of the areas falling within the Local limits of all ' A ' and ' B ' Class Municipal Councils ;

(*c*) Zone III–Shall comprise of the areas in the State which are not included in Zone I and Zone II ;

(*d*) the minimum rates of daily wages payable to an employee employed on daily wages shall be computed by dividing the minimum rates of monthly wages fixed for the class of employees to which he belongs by twenty-six, the quotient being stepped upto the nearest paisa ;

(*e*) the minimum rates of wages shall be inclusive of payment of remuneration in respect of weekly day of rest ;

(*f*) the minimum rates of wages shall consist of basic rates, the cost of living Allowance ;

(*g*) a skilled employee is one who is capable of working efficiently, exercising considerable independent judgment and discharging his duties responsibly ;

(*h*) a semi-skilled employee is one, who does work generally of a well defined routine nature, wherein the major requirement is not so much of the judgement, skills and dexterity, but of proper discharge of duties assigned to him for a relatively narrow job and important decisions are made by others. His work is thus limited to the performance of routing operation of limited scope.

(*i*) an unskilled employee is one who does operations that involve the performances of simple duties which require exercise of little or no independent judgment or previus experience, although a familiarity with the occupational environment is necessary. His work may thus require, in addition to physical exertion, familiarity with a variety of articles or goods.

## APPENDIX

The average Consumer Price Index Number in respect of ten centres in the State of Maharashtra for working class (New Series 1982=100) shall be the Cost of Living Index Number applicable to the employees employed in the said scheduled Employment. The Competent Authority appointed by Government shall, after the expiry of every six months commencing on the first day of January and the first day of July, calculate the average of the Cost of Living Index Number applicable to the said employee for these six months and ascertain the rise of such average over 714 points. For such rise of every point, special allowance (hereinafter referred to as " the Cost of Living Allowances") payable to the employee in the said Scheduled Employment for each of the six months immediately following six months in respect of which such average has been calculated at the rate of Rs. 5.10 per month in respect of all Zones.

The Cost of Living Allowance computed as aforesaid shall be declared by the Competent Authority by notification in the *Official Gazette* in the last week of July when such allowance is payable for each of the months from July to December and in the last week of January when such allowance is payable for each of the months from January to June :

Provided that, the Competent Authority shall declare the Cost of Living Allowance Payable in respect of the period from the date of fixation of the rate of minimum wages to the end of December or June, as the case may be, immediately after the said date with effect from which the minimum rates of wages are fixed.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

B. S. WANKHEDE,
Deputy Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATIONS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004.